**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मर्यादित या मंडळाचे संपूर्ण कामकाज कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाकडून नियोजन विभागाकडे हस्तांतरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कौविउ-२०२०/प्र.क्र ९७/रोस्वरो १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०२०.

वाचा:- १) रोजगार व स्वयंरोजगार विभाग शासन निर्णय क्र.अमामं १९९८/प्र.क्र.३६३/रोस्वरो-१ दि.२७.११.१९९८.
२) इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे क्र. सारथी २०२०/प्र.क्र.३८(भाग-१)/महामंडळे, दि. २७.०७.२०२० चे पत्र.

प्रस्तावना:-

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ या संस्थेची स्थापना रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र.१, शासन निर्णय दि.२७ नोव्हेंबर,१९९८ अन्वये करण्यात आली आहे. महामंडळाची कंपनी कायदा, १९५६ अंतर्गत नोंदणीकरण करण्यात आली असून त्यावेळी महामंडळाचे भागभाडंवल रू.५० कोटी इतके होते. महामंडळाचे मुख्य कार्यालय मुंबई येथे असून महामंडळातील संचालक, सदस्य संख्या जास्तीत जास्त १५ इतकी आहे. राज्यातील आर्थिक दृष्टया मागास असलेल्या घटकांचा सामाजिक विकास करणे तसेच बेरोजगार तरूणांकरीता रोजगार व स्वयंरोजगार उपलब्ध करून देण्याकरीता महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. दिनांक ३१ मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये महामंडळातील अंशदान भागभांडवल वाढवून रूपये ४०० कोटी इतके करण्यात आले आहे. दिनांक ०२ फेब्रुवारी, २०१८ पासून १) वैयक्तीक कर्ज व्याज परतावा योजना २) गट कर्ज व्याज परतावा योजना ३) गट प्रकल्प कर्ज योजना या तीन योजना महामंडळामार्फत राबविण्यात येत आहेत.

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या आर्थिक व प्रशासकीय बाबींवर नियत्रंण ठेवण्याची जबाबदारी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागा ऐवजी नियोजन विभागाकडे देण्याचा निर्णय मा. उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०९ जुलै, २०२० रोजी सारथी संस्थेच्या आढावा बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने घेण्यात आलेला आहे. सदर महामंडळ कौशल्य विकास व उद्योजकता विभागाकडून हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ संबंधित संपूर्ण कामकाज तेथील सर्व योजनांसह कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाकडून नियोजन विभागाकडे वर्ग करण्यात येत आहेत.

२. उपरोक्त प्रमाणे हस्तांतरीत करण्यात आलेल्या सदर विषयांशी संबंधित उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदी तूर्त नियोजन विभागाने प्रस्ताव सादर केल्यानंतर कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाकडून वितरीत करण्यात येतील. मात्र नियोजन विभागाने यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष तात्काळ उपलब्ध करुन घ्यावे. तरतुदी करण्यासाठी लेखाशिर्ष घेणे व त्याअंतर्गत आवश्यक अर्थसंकल्पिय तरतूद करणे,

पुरवणी मागणी करणे, निधी वितरीत करणे या अन्य बाबी यापुढे नियोजन विभागाने हाताळाव्यात. या विषयासंबंधीच्या सर्व नस्त्या व कागदपत्रे कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाकडून नियोजन विभागाने ताब्यात घ्यावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०१११२१५४२५८२८०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.11.12 15:45:11 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद),महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय मुंबई.
५) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
७) मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय,मुंबई.
८) अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई .
९) सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
१०) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग,मंत्रालय,मुंबई.
११) अध्यक्ष /व्यवस्थापकीय संचालक , अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई .
१२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर.
१३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, कोकण भवन, नवी मुंबई.
१४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी , मुंबई.
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता संस्था, मुंबई.
१७) अध्यक्ष , महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ , मुंबई .
१८) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण परिषद, मुंबई .
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२०) कक्ष अधिकारी (र.व.का.),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
२१) निवडनस्ती (रोस्वरो -१ ).